**R.A.A. to Special Repairs/Extension and improvement to Navegaon Bandh of fider Canal Project (TL. Arjuni Morgaon Dist. Gondia)**

**नवेगांव बांध पूरक(फिडर) कालवा योजना ता.अर्जुनी मोरगाव, जि. गोंदिया विशेष दुरुस्ती/विस्तार व सुधारणा कामास प्रथम सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग,**
शासन निर्णय क्र.सुप्रमा २०१०/(१३/२०१०)/सिंव्य(कामे)
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक : १७/०९/२०११**

**पहावे :** १) शासन निर्णय क्र.संकीर्ण २०००/(३४४/२०००)/सिंव्य(कामे), मंत्रालय, मुंबई, दि.२३/९/२००३
२) मुख्य अभियंता, जसंवि, नागपूर यांचे पत्र जाक्र.४४६१/नातां-२/नवेगांव बांध पुरक कालवा/सुप्रमा/०९, दि.१९/११.२००९
३) का.सं.विपाविम,नागपूर यांचे पत्र जाक्र. ६०३४/विपाविम/का.तां-५/धा-१३० /२०१०, दि.१.१०.२०१०

**प्रस्तावना :**

नवेगाव बांध पूरक कालवा योजना ही इटियाडोह धरणाच्या सांडव्याची उंची वाढवून निर्माण झालेल्या अतिरिक्त पाणी साठ्यातून केलेल्या नियोजनाचा भाग आहे. या योजनेसाठी लागणारे १७.६५ दलघमी पाणी इटियाडोह धरणातून झाशीनगर उपसा सिंचन योजनेची उपसा सिंचन यंत्रणा वापरुन तसेच झाशीनगर वितरण प्रणालीतून केवळ एक पूरक कालवा काढून त्याद्वारे नवेगाव बांध जलाशयात सोडून व तद्नंतर नवेगाव बांध प्रकल्पाच्या वितरण प्रणालीतील वंचित १५५० हे.क्षेत्रास सिंचन करण्याचे प्रस्तावित आहे.

सदर कामास शासन निर्णय क्र.संकीर्ण २०००/(३४४/२०००)/सिंव्य(कामे), दि.२३.९.२००३ अन्वये रु.५५१.०० लक्ष (रुपये पाच कोटी एकावन्न लक्ष मात्र) अंदाजित खर्चाच्या प्रस्तावास मूळ प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. या कामावर सप्टेंबर, २००९ अखेर रु.३८१.३४ लक्ष खर्च

झाला आहे. दरसूचीतील वाढ, भूसंपादनाच्या किंमतीत झालेली वाढ, संकल्पनातील फेरबदल व इतर कारणांमुळे अंदाजपत्रकीय खर्चात वाढ झाली आहे. त्या अनुषंगाने या कामास सुधारित प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता.

## शासन निर्णय :

या शासन निर्णयाद्वारे नवेगाव बांध पूरक कालवा (फिडर) योजना मधील विस्तार व सुधारणा कामास एकूण अंदाजित किंमत रु. ३०५१.३७७ लक्ष (रु.तीन हजार एकावन्न लक्ष तीनशे सत्त्याहत्तर हजार मात्र)रकमेस रु.२७८९.३०५ लक्ष कामाप्रित्यर्थ व रु.२६२.०७२ लक्ष अनुषंगिक खर्च इतक्या खर्चाच्या प्रस्तावास खालील अटींच्या अधीन राहून सोबतच्या परिशिष्टाप्रमाणे सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सुधारित प्रशासकीय मान्यतेचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहे.

१. सदर प्रकल्पास महाराष्ट्र सिंचन पद्धतीचे शेतकऱ्याकडून व्यवस्थापन अधिनियम २००५ लागू करावा व त्यातील कलम ६ नुसार प्रकल्प अधिसूचित करण्यात यावा, अशी अधिसूचना काढल्यानंतरच उर्वरित दुरुस्तीची कामे हाती घेण्यात यावीत.

२. शासन निर्णय क्र. मजसुप्र १००६/(६८८/०६)/लाक्षवि(कामे),दि.१४.६.२००७ अन्वये लघु वितरिकास्तरीय पाणीवापर संस्थांच्या कार्यक्षेत्रातील हस्तांतरपूर्व/ विशेष दुरुस्तीची कामे कंत्राट व्यवस्थापन समिती स्थापन झाल्यानंतरच हाती घेण्यात यावीत.

३. सदर प्रकल्पाचे काम नियोजित वेळेत व प्रशासकीय मान्यतेच्या तरतुदीच्या मर्यादेत पूर्ण करण्यात यावे.

४. शासन परिपत्रक क्र.संकीर्ण २००९/(४६५/२००९)/मोप्र-२,दि.१५.१.२०१० मधील सर्व अटींच्या अधीन राहून कामाची दुरुस्ती करण्यात यावी.

या कामावर होणारा खर्च ४७०१-मोठे व मध्यम पाटबंधारे यावरील भांडवली खर्च (विस्तार व सुधारणा/विशेष दुरुस्ती) ८० सर्वसाधारण, १९० सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका, (११)(०१)वि.पा.वि.महामंडळास भाग भांडवली अंशदान (योजनांतर्गत) (४७०१ जे १५८) या लेखाशीर्षाखाली खर्च टाकावा व मंजूर अनुदानातून भागवावा.

या कामास प्रदान करण्यात आलेली सुधारित प्रशासकीय मान्यता सिंव्य(कामे) कार्यासनाच्या

नोंदवहीमध्ये क्र. **२१** सन २०११-१२ वर नोंदविण्यात आलेली आहे.

हा शासन निर्णय जलसंपदा विभागाच्या शासन निर्णय क्र.१०९९/(१२६/९९)/मोप्र(प्र), दिनांक १८/५/१९९९ मधील परिच्छेद १(अ) नुसार आंतरवित्त सल्लागार व उपसचिव यांच्या सहमतीने विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय शासनाच्या संकेत स्थळावर(www.maharashtra.gov.in) उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संगणक सांकेतांक २०११०९१७१६३७२७००१असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सोबत : परिशिष्ट

**( पां. तु. केदारे )**
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :

महालेखापाल १/२(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
महालेखापाल १/२(लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
मा.सभापती/उपसभापती, विधानपरिषद, विधानभवन, मुंबई
मा.अध्यक्ष/उपाध्यक्ष, विधानसभा, विधानभवन, मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानपरिषद, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
मा.विरोधी पक्षनेते, विधानसभा, मुंबई यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई
स्वीय सहायक, मा. मंत्री, जलसंपदा (मकृखोविम वगळून), मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, मा. राज्यमंत्री, जलसंपदा, मंत्रालय, मुंबई,
स्वीय सहायक, प्रधान सचिव (जलसंपदा), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, सचिव (लाक्षेवि), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर,
मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, नागपूर,
आंतरवित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई
उप सचिव, (सिंव्य), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधिकरण, नागपूर,
अवर सचिव (सिंव्य/कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
उप अभियंता, सिंव्य(कामे), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
ग्रंथालय, विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई,
सिंव्य(कामे)/कार्यासन, संग्रहार्थ.

**शासन निर्णय क्र.सुप्रमा २०१०/(१३/२०१०)/सिंव्य(कामे),**
**दिनांक /०९/२०११ चे प्रपत्र**

**परिशीष्ट**

| **अ.क्र.** | **शीर्ष/उपशीर्ष** | **अंदाजित किंमत (रु.लक्ष)** |
|---|---|---|
| **१** | **२** | **३** |
| १ | अे- सर्व्हेक्षण | १९.७१२ |
| | बी- भूसंपादन | १६८.५८ |
| | सी- कामे | २५१.८३२ |
| | डी- विमोचक | ७५.२०१ |
| | ई- प्रपात | १३.१७२ |
| | एफ - आर एच टी वर्क्स | ५३७.४०४ |
| | जी- पूल | ९६.६४९ |
| | एच- एस्केप | ५.०० |
| | के-इमारती | ५.०० |
| | एल-मातीकाम | २८५.३२५ |
| | एम-वृक्षारोपन | २.०० |
| | ओ-संकीर्ण | ३.०० |
| | पी-देखभाल | २०.७४९ |
| | आर-दळणवळण | ५.०० |
| | वितरिका व शाखा कालवा | १०३२.१२८ |
| | पाटचारी | २५५.३६० |
| | जलनिस्सःरण चारी | ३.१९२ |
| | पर्यावरण | १०.०० |
| | एकूण | २७८९.३०५ |
| | अनुषंगिक खर्च | २६२.०७२ |
| | **एकूण अंदाजित खर्च** | **३०५१.३७७** |